ले. २५४ श. १५९४ फा शु. १४
ता. २०।२।१६७३ इ.

चजानेच कारकुनानी ता गुजनमावल विद्यानद सलास सबैन आलफ मा
श्रीशिवन हैबतराऊ सिलाबरर देसमुख ता मजकूर हे सन समा-
रपति हर्ष (नाम)धे शक धरुनु बाहीर पडिले होते ते कौल घेउनु
निदान मद्दा हुजुर साहेबास भेट्ले साहेब यावरी मेहरवान होउनु या-
देव मतिम ( चे दे ) समुखाचे वतन याचे दुमाला केले आसे तरी
त मधान यांचा देसमुखीचा कारबार याच्या हाते घेणे व देसमुखात
यावयाची मोइन ता। मजकूर ता सालगु। चालत आली आहे त्यापैकी मा। चीं
तस्सीम मा।इलेचे दुमाले करणे सेरीज माइलेस साहेब मेहेरवान मौजे बो(पे)
देह १ यक कुलबाप कुलकानु सारा गाव साल दर साल यावयाचा तह केला
आहे तरी पेस्तर साल सन अर्बा सबैनापासुन मौजे बोपे ता। मजकूर देह १ येक
साल दर साल दुमाला करीत जाणे या गावावरी + ( भाऊचद ) मा।इलेचे त्यासी
समध नाही हे गाऊ मा।इलेसच दिल्हे आसे दुमाले करणे तालिक लेहोन घेउनु
असल सनद माइलेपासी देणे पा हुजूर पा राजश्री-पत* पेशवे छ १२ जिलकाद
मोर्तब*सुद मया । देयविग । जते । ( तीन ओळी )

मार सुा

सुरु सुद

---

ले. २५५ श १५९४ फाल्गुन शु. १४
ता. २०।२।१६७३ इ

चजानेच कारकुनानी ता गुजनमावल विद्यानद सुा सलास सबैन आलफ
श्रीशिवन मा हैबतराऊ सिलाबरर देसमुख ता मजकूर ह शक धरुनु सन
रपतिहर्ष समानामधे बाहिर पडले होते ते कौल घेउनु हुजुर येउनु साहेबास
निदान मद्दा भेटले यावरी साहेब मेहेरवान होउनु बदल बकसीस दर सालास
देव मतिम सुदी टके १०००० येक हजार टके यावयाची मोईन केली
त मधान आहे तरी मा।इले जोवरी हयात असतील तोवरी ता मजकूर
पैकीं पेस्तर साल सन अर्बा सबैनापासुन दर सालास टके १०००० येक हजार
टके रास आदा करीत जाणे सदरहू बेरीज साल दरसाल अदा करीत जाणे

* अक्षर वेगळें. १ श. १५९५.

तालीक लेहोनु घेउनु असल सनद माइलेपासी देणे पा हुजूर रा पत * पेशव छ १२ जिल्काद *मोर्तब सुद मर्या । देयविरा । जते । ( तीन ओळी )

सुरु सुद

---

## ले. २५६

श. १५९४ फाल्गुन शु १४
ता २०।२।१६७३ इ.

यजतेच कारकुनानी मा गुजनमावल चिद्दानद मुा सलास सबैन अलफ

श्रीशिवन — मा हैबतराऊ (सिलांब)कर देसमुख ता मा + + + +
रपतिहर — + + + हे बाहीर पाडले होते ते कौल + + + घेउनु भेटले
निदान महा — यासि गला खावयास पाहिजे तरी साल मजकुराकारणे +
देव मशिम — मजकूरपैकी गला मडी दाहा पधरा खडी पावेतो माइलेस
ततधान — देणे + + स यक हजार टके खावयाची मोइन केली आहे

त्यामधें साल मजकुरी जो गला पावेल त्याचे नख्त माहालीच्या सिरस्तिप्रमाणे हजारा टकियात वजा करुनु + (कु)ली बेरीज पेस्तर साली आदा करणे अणी गला सदरहू प्रमाणे याच्या किर्दीयासि देणे छ ( १२ ) जिल्काद मोर्तब* सुद मर्या । देयविरा । जते ।

( तीन ओळींचा मोतब. )

पेवस्ती छ १७ मिनहू

सुरु सुद

---

## ले. २५७

शके १६२५ पौष शुद्ध २
ता. २८ डिसेंबर १७०३ इ.

राजमान्य राजश्री हैबतराऊ देशमुख मा गुंजणमावळ यासि

॥छ अखडित लक्ष्मी आलंकृत + श्रेहांकित हिरोजी अताजाराऊ + + सुहूर सन अर्बा + + आलफ तुम्ही पत्र पाठविलेन तेथे लिहिलेत की आम्हास राहावयासि व लोकाचे कबिल ठेवावयासि कोठे जागा दिसत नाही याकरिता बहुतच कष्ट पडिले आहे याकरिता आज्ञा जर होईल तर सिवनेरात राहून कबिले ठेऊन ये गोस्टीच काये आज्ञा मणोन लिहिले तर पातशाही फौजा चालिल्या आहेत आणि तुम्हास आम्ही हरकोठे राहावयासि आज्ञा करावी तर हे विहित नव्हे तर तुम्ही खानसाहेबास अर्जदास्त लिहिणे व यक आपला भला माणूस

---

+ अक्षर वेगळें.

पाठवणे त्यास आधी राजपुरीस रवाना करून मग जो काये हुकूम होईल त्यासारिखे तुम्हास कलो येईल कलले पाहिजे व गुणाजी राऊ सोपड्याचे वर्तमान लिहिले तर त्यास आम्ही जेव्हा वरत दिल्हे होते आणि सांगितले की तुम्ही कबिला ठेऊन येणे मग जे ठिकाणास खानसाहेब राहावयासि सागतील तेथे राहाणे त्याची सर्फराजीच होती त्यास त्याही तर बेइमानपण करून आले नाही तर आता आम्हास लिहिणे सरकार नेसते बेइमानच (!) आहेत त्याचे मनमाने तिकडे जाऊन यानतर राणा इमानी हे कोठे असेत त्याचे वतनाचे कागद आम्हाजवल असेत तर पाठवावे येसे आहे तर कोण जागा पाठवावे ते लिहिणे म्हणोन लिहिलेत तर ती आम्हाजवलच असेत त्याचा मामला ( मोठा ) जाला याकारिता तुम्ही मामले सकतसीरीने त्याजवरून कागद तुम्ही घेतलेत असा तर तो कागद आम्हाजवल पाठवणे आम्ही त्यास देऊन कलले पाहिजे बहुत काये लिहिणे रा॥ छ १० साबान हे विनती सन ८७

फारसी शिक्का व मोर्तब

---

ले. २५८ श्री श. १६२६ मार्गशीर्ष शु. १५
ता. २१।११।१७०४ इ.

॥ छ, मा॥ अनाम दौलतराव व कृष्णराव बिन शेंकरराव व सुभानराव बिन श्री चद्रराव सिलिमकर देशमुख ता॥ गुजणमावळ यासि चिमणाजी शंकराजी नारायेण सचीव सु॥ खमस खमसेन मया आलफ तुमचा व भगवतराव बिन महिपतराव सिलिमकर यांचा कजिया देशमुखिच्या वतनाचा वारियाचा जाला याजबदल हर दोजण भाडत हुजूर कसबे भोरच्या मुकामास येऊन आपापलें वर्तमान विदित केले त्यावरून तुमचा हर दोजणाचा करिना मनास आणिला तुमचे पणजे हैबतराव यास श्रीमंत माहाराज राजश्री संभाजी राजे छत्रपती स्वामी यांणि रायेगडी आसतां हुजूर बोलाविले सबब की तामस मिळाले त्यांचा ढगेली कबूल करून त्यांस रायेगडास आणावे येसे वर्तमान आहे त्याची तहकिकात कैसी म्हणून विचारिलें त्यास हैबतराव सिलिमकर याणी महाराजासी क्रियाशपथ केली त्यावरून महाराज छत्रपती स्वामीनी हैबतरायांसी आज्ञा केली जे येक वडील पुत्र तुमच्या पुत्रांत असेल तो वोलेस ठेवणे येसी आज्ञा केली यावरी आज्ञा मान्य करून यां हुजरे घेऊन घरास आले महिपतराव व भगवतराव सिलिमकर याचे बाप त्यास वोलेस रायगडास पाठवीत होते अतिशये दोन च्यार वेळला केला परंतु कबूल करिनात मग तुमचे आजे चद्रराव सिलिमकर यास पाठविले ते रायेगडास गेले आपण पळोन मोगलाईत चालिले तेव्हा चद्रराव याची मातुश्री जिजावा हैबतराव यास बोलिली की माझा लेक चांद्रोबा रायेगडास

वजागत माय सेलोजी भोसले आन् मुकद्मी देहे च्याहार व मोजव कबूल अर्जी मुकर्रर कर्दाअन्द

छ. कारकुनानी व देसमुखानि परगणे कडेवलीत चिदानद मुा इहिदे सलासीन अलफ वामाय सेलोजी भोसले याची मोकदमी देहाये ४ परगणे मजकुरुची बयाज कसबे जिती व मौजे माथेरे व मौजे पाथर व मौजे कुलधरण सदरहू देहाची पेसजीप्रमाणे हाली माहलेसी करार केली असे दुमाले कीजे व देहाये मजकुरी मोकदमीचे काम घेत जाणे देहाये मजकुरी हकलाजिमा सालाबाद असेली तेणेप्रमाणे दुमाले कीजे ( फा. मो )

तेरीख ५ जमादिलावल

---

ले. १६०

श. १५६८ कार्तीक शु. २

कदालयाम असला तरी याच दुमाल करणे की रयेती आणून कदीम व जदीद प्रजा अबादानी करील म्हणोन हुकूम सादर जाला यावरी + + + तहकाक केले की मोकदमी याची हाये तरी बहादुरजी वलद उमाजी भोसले मोकदम कसचे मार याच हाते मोकदमीच कामकाज घेण व कमच मार वेराण आहे यास कदाम जदीद कुले आणून लावणी करवण मोकदम मजकुराचा हकलाजिमा व इनाम शुद्दामद चालन आला आह तेणप्रमाणे चालविण

सफर

---

ले २६२

श १६६१ पौष शु ११
ता १२।१२।१६८९ इ

( फारसी मजकूर ९ ओळा व शिक्का गोल )

( मोहर ए आयम अबुत्तराब काजी सादिम शा अ )

आर्जदास्त आन बदगी बदे कमान कमतरीन बदेगानी बदे देशमुखाना व देशपाडये व समस्त रया कसब जिता पा चाभारगोंद सरकार आहमदनगर सुबे खुजस्त बुनयाद सुहा १०९९ जमी पाश आदास

हमा ता छ ९ माहे रबिलोवल साहेबाचे नेक नजरे करून बसेर सलाहित आसे

हमा साहेब सलामत बहादुरजा वलद उमाजी भोसले याना हुजुरून हुकूम बनाम शफअत पन्हा नियाज सोज हुकूम आणिला जे माइलेची मोकदमी कसबे मजकूरची कदीम आह सातिरेसी आणून माइलेचे दुमाल करण म्हणोउन हुकूम आणिला त्यावरून शफअत पन्हा न्याज सोज यही आपणासी हुजूर बालाऊन पुरसास केली जे हे कदाम मोकदम होयेती म्हणोउन पुसिले त्यावरून आवण जाहीर केले मालजी भोसले याचे फर्जद शाहाजी सभाजी याचे फर्जद उमाजा याचे बहादुरजी हे मिरासदार मोकदम होयेती येसी हकिकती हे कदीम हावती बदगीस रोशन होये

समस्त रयाया का मार
१ दा रामचद्र बयाजा
देशमुख पा मजकूर
१ दा माहिपाजी लिंगरस
व हसराज गिरमाजी व
राघोजी मल्हारजी देश
पाडे पा मार
( १ हा ओळी आडव्या आहेत )

---

ले. २६३

श १६२५ श्रावण व. ७
ता. २२।८।१७०३ इ.

महजर श्री सके १६२५ सुभानुनाम संवतसरे श्रावण वदी ७ सप्तमी वार रविवार त दिवसी मातुश्री मनूबाइ भासले मोकदम का। जिती वगैर यासि म्हलोजी पा। मो निमे व समस्त दाहि जन मौजे पिंपळगों पिसा पा। पारनेर सा। जुनर सु॥ सन हजार १११३ कारणे लेहोन दिधले ऐसे जे मौजे मजकुरीची निमे मोकदमी बाळाजी कोनेर माहाराजांचा चाकर करीत होते व निम मोकदमी अपली आहे ऐसियासि बाळाजी कोनेर वरसे चाळीस गेले त पुन्ह दुसरियाने गों गावाचे आले नाहीत येसीयासि गनिमाची धामधूम फार व कितक फसाले पाडरीचे काम व अपला हाल व गावाचा हाल काहीं राहिला नाहीं जैसे तैसें करून अपण आर्जे॰ तागाइत वतण रासिलें व वतण रासिल तें काही बाळाजी कोनेरचे वतन म्हणऊन रासिल नाहीं बाळाजी कोनरचे माहाराजाचा चाकर त्याचे वतन तें माहाराजाचें वतन याबद्दल अपणामधें काहीं तारती राहिली नाही अनीक कोण्हास वतण व्हेहोन देऊन अपनास भाऊ करून वतण चालवावें तरी वतन माहाराजाचें याकरितां माहाराजाचें वतण माहाराजाच्या हवाला केले असें तुम्ही निमे मोकदमी व मानपाण हकलाजमे बाळाजी कोनेर यासीं दिधला आहे तेणेप्रमाणें खाऊन वतन माहाराज लेकराचे लेकरी खात गेले पाहिजे कालकळा बाळाजी कोनेरांचा लेक अगर भाऊबंद अगर असीवावसाचा कोन्ही वतनाबदल उभा राहिला तरी त्यास वतनासी समंध नाहीं खुद्द निमे वतन माहाराजाचें आहे बाळाजी कोनेर याणे जे परवाहा पाळला होता तेथें परवाहा पाळोन लेकराचे लेकरी वतन खाऊन सुखीं नांदणे समस्त दाहि जन व यारा बलुने १ समाकुल पाटरी व हणमत साक्ष करून तुम्हास व्हेहोन दिधले असे यासिं अपण मवादिगर होऊन अगर अपले असीवसाचा भाऊबंद नपदिगर करील तरी अपनास आपल्या कुलस्वामीची व पूर्वजाची अनेगा असे व गोहत्या व महाहत्या पातक केलियाची अनेगा असे सदरहू हकलाजिम काळी व पाढरी कदीम व जदीद माहराज खाऊन सुखे वतण खाणे यासि कोन्ही हिलाहरकत करील ता दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा आचार यमी योखी सुमार ४५ पचेनाटीस बमहजर सही नेरिस ८ १९ माहे रबिलावर

निशाणी नांगर

सा। भैराल रघुनाथ
जोसी व कुलकर्णी
मौजे मजकूर

सा। गणेश गोपाळ
जोसी व कुलकर्णी
मौजे म्हार

१ 'गा' अधिक पडला आहे.

गोही

| | |
|---|---|
| गगाजी नरसिह<br>देशपांडे पा वागी<br>सा परडा | महिपाजी लिगरस<br>देशपांडे पा घाभार-<br>गोदे पांढे नेहगाऊ<br>व कडेवलित |

गोही मौजे मार

| | |
|---|---|
| रायाजी बिन पद्माजी<br>जसनाथ मौजे मार<br>यमाजा बिन येल्होजी<br>भुसाल मौजे मार<br>रसम मालु बिन कान<br>मालू दरवडे मौजे मार | सुभानजी बिन<br>नाइकजी गलहिले<br>मौजे मार<br>राजोजी बिन माना-<br>जी विधाये मोज मार |

---

ले २६४ श. १६३३ अ. भाद्र० व ११
ता. २८।८।१७११ इ.

( " फा. पा शि मजकूर " दउदखान फिदवी । बादशाह
अलमगीर गाजी । सन अहद । " )

येथाल मोकदमी मातुश्री मकाई आऊ भोसले याची पुरातन आहे त्यास सांप्रत रभाजी निंबालकर याणी जोरावारीने कबज करून गुमास्ता बैसविला याकरिता मातुश्री हुजूर नबाप अमिरुल उमराव याकडे येऊन आपली हकीकत जाहार केली त्यावरून नबाबानी रभाजी निंबालकर यास हुजूर आणून उभयतांचा करिना मनास आणिता रभाजीने जोरावारीने कबजा केला आहे इनसाफमुले रभाजी निंबालकर खोटा जाहाला भोसले याची मोकदमी पुरातन खरी जाहाली त्यावरून रभाजी निंबालकर याणे हुजूर लिहिले दिले की आपल्यास कसबे जिंतीचे मोकदमीस समध नाही भोसले याची मोकदमी भोसले याणी करावी येसे जाहाले त्यावरून कसबे मजकूरची मोकदमी मकाई आऊ भोसले याची पुरातन आहे तेणेप्रमाणे याचे दुमाला केली असे याच हातून मोकदमाचे कामकाज घेत जाणे याचा मोकदमीचा हक व इनाम लाजिमाची व शेरी पुरातन चालत आले आहे त्याप्रमाणे चालवीत जाणे रभाजी निंबालकर याचा गुमास्ता गावात होता तो लावून देणे दस्तलागिरी त्यास होऊ न देणे भोसले याची मोकदमी भोसले यास चालवणे फिरोन याभाग पडू न देणे जाणिजे छ २० मोहरम आज्ञा प्रमाण ' लेखन । सीमा ।'

( असा दोन ओळींचा मोतब )

सुरु सुद

१ जीव माहाला
१ सुमानजी बिन पिराजी न्हावी
१ तुलचाजी कोली
१ येमनाक बिन पुजनाक माहार
१ मडनाक बिन थावीनाक माग कोतवाल
१ सतनाक माग
१ दसजी धारक
१ जान माली ( बिन होन माली ) सेरकर
१ बनाजी बिन तान्हाजी कुभार

१५

१ गुडाणा कोस्टी कानडा
१ समु बिन यसापा कानडा
१ कुस माली मेहतरा
१ कमपा कानडे कोस्टी
१ पुताजी वाडघर चौगुले

१०

येकूण २५ सदरहूनी गोही दिल्ही की जे लाहाम नाकाने जे तकरीर केली आणि लेहोन दिल्हे हे सही

( वा मो )
बिा नरसिंह बालाजी कुलकर्णी कसबे मजकूर

ले २६७ १७ वाई- देशपांडे श १५६४ श्रावण बा ४ ता ३।८।१६४२

देसकुलकर्णी पा वाई दिल्हे आहे देसील महसूल व नकदयाती व सा गला व पीव व कडदी कुलबाब दा ठाणे बाब दुबाल कीजे बदुव अवलाद अहफाद चालवणे या इनामास मुसलमान अगर हिंदू सलल करील त्यांस अपले मजहबांची सौगद आहे सदरहू जमीन दस्ती याद तणुन हद महदूद घालून देणे हर साला ताजा सुदं सनाचा उजूर न करणे तालिक लेहून घेऊन असल सुा इनामदाार मजकुरास परतून दीजे ० •
( फारसी मोहर )

तेरीख २० माहे मोहरम

( शिक्का )

फलोजी

सयदबिन बापूजीराव

---

ले २६९    १८ ओझर्डे- पिसाळ देशमूख    श १५९१ श्रावण शु॥ ५

ता २३।७।१६६९ इ.

लुटून नागऊन कलेल तो इलाज करून आपले पारपत्य करून घेतील येस्या दो गोष्टीने साहेबी मदत केलिया साहेबाचे सेवेसी पेसकसी होन पा २००० दोन्ही हजार उसुल चौ साला हर साला होन पा ५०० प्रमाणें देऊन तरी येविसी कौल मरहमत जाला पाहिजे म्हणून अर्ज केला तरी सद्राहू अर्ज मनास आणून तुम्हास ये बाबे कौल मरहमत केला असे तुमचे बाबे पा मजकुरास सुबेदार व कारकुनासी रदबदल करून सटपट करावा भले माणूस हेजीब पाठऊन त्या हाती सागोन पाठऊन की दतार्जी केशवजीचे वारिसदार गगाजी व दताजी याची पाठी तुम्ही रासता यात फाइदा नाहीं येणेंकरून मुलकास आजार पावेल तरी येसे न करणें जेणेंप्रमाणें पेशजी पासून चालत आलें आहेत तेणेंप्रमाणें दताजी केशवजीची देसमुखी बिलाकुसूर चालवणे मुतालिकास कैद केले आहे ते सोडून देणे वस्तभाव घोडी जे घेतले आसेल ते परतोन देणे गगाजी व दताजी वारिसदार पहिलेपासून जे सात आले आहेत ते राऊन हालसुद राहेत ते करणे कुसुर होर नेदणे येस्या दाम्पटीच्या गोष्टी हेजिबा हाती करऊन तुमचे पारपत्य होये ते करून जरी या गोष्टी सुबेदार व कारकून नाइकेत आणि पारपत्य न करीत तरी मग तुम्ही हामचे विलायेतीस हर येक जागां येउनु सुखे असणें आणि दाहावीस स्वार फावतील तितके करून शर्तीनसी दावादरवडा करून पा मजकुर विलायतीस आजार देवइल तैसा देऊन आपले पारपत्य होऊन ये तें करणें सद्राहू दोन्ही गोष्टीने आम्ही तुमची पाठी राखावी यावदल पेशकसी होनु पादशाही २००० दोनी हजार उसूल ४ च्यार साला दर साल मजकूर सन सबैन पासून हर साला होन पा ५०० पाचसें प्रमाणें चौ वर्षांनी होनु दोनी हजार यावे म्हणून केदारजी सुरो तुमचे मुतालिकानी फतवा लेहून दिल्हा असे तेणेंप्रमाणें पेसकसीचा उसूल ता। जाउलीचे सुबा करणें येविसी कौल असे छ ४ रविलोवल तुमचे वारिसदारास आसीरा नसे ये बाबे कौल आसे मोर्तब सुद [1] मर्या । देयविरा । [2] जते ।

रुजु सुद
निवीस
सुरु सुद

---

ले. १७०

मोर्तब फाटला आहे.

मोहयान पन्हाई मुबरीसान दस्तगाही दताजी नाइक देसमुख पा वाई अजी दिल येमलास सेग दाउद दुवा सलाम मकसुद प्यार येथील खैर सल्ला जानउनु तुम्ही

---

१, २ अक्षर वेगवेगळे. ३ जोडावर हा शिक्का आहे.

आपली सेर सुर्तीची कितायत लिहीत जाने आमन छ २१ माहे रजयु लस्कर जहुर असर दाखल जालों व मियाचे लिहिले व तुमची इलतमास इ नावे (तुका) दुलामानास गुजरानेली खान मजकूर आपले मुनसी यासि हुकूम केला जे अर्जी तयार करणे जे बादशाहजीस अज करून अर्जी तयार जालियावरी जे हकीकत होइल ते लेहून पाठउनु व मियास फुतुक(ला) खानाचे फोजेची दिवानगिरी जाली तुम्ही मियास कागद येथुनु पाठवितात ते ज्या वख्ती तुम्हाजवळ पावतील तेच वख्ती रवाना करीत जाने तुम्ही मियाचे हाते फुतुकखानाची भेट घेने दिगर हकीकत माहार जपानी सागता कलो येइल जियादा काये लिा हे किा

— —

ले २७१ श्री

श १६०५ पोष वा १२

ता ३।१।१६८४ इ सन

स्वस्ति श्री राज्याभिषेक शक १० रुधिरोद्गारी सवत्सरे पोष बहुल द्वादस गुरुवासरे क्षत्रियकुलावतंस सिंहासनाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी देशमुखानी प्रात वाइ यांसी आज्ञा केली ऐसी जे सुलतान माजम व शाबदीखान

| | |
|---|---|
| श्री शंभुनर<br>पति हर्ष निदान मोर<br>श्वर सुत नीळकंठ<br>मुख्य प्रधान | गनीम दोघे कडून कोकणांत उतरला याप्रसगे हशामाचे बहुतच प्रयोजन आहे याकरितां राजश्री सताजी येमाजी सरनिरा ++ यांला नौ सचणी हशामाचा जमाव करावयाबद्दल वरघाट प्राते (पाठ) विले असे |

हे तुम्हांला हशामाचे जमावाविशीं सागतील तेण्हेप्रमाणें (इ) शम नौ सचणी करून पाठऊन देणें हे काम म्हणजे बहुत नाजु (क आहे) या प्रसगे जरी हशमाचा पोख्त जमाव जाला तरी गनिमाचा क्राय (गु) मान लागला घुडविलाच जातो येवढें काम जाल्यानें तुमचा बहुतच मजुरा होतों आजीवरी स्वामीने तुमचे चालविले ते सार्थक यां दिवसांत करून आपला मजुरा करून घेणें हशमाविशाई सताजी येमाजी तुम्हाला कितेक सांगतील तेण्हेप्रमाणे तुम्ही तलाष तरतूद करून हशम पाठऊन देणें म्हणजे स्वामी तुम्हावरी सतोशी होतील आपलें समाधान असों देणें लिा मा वतणूक करणें लेखनालंकार मर्या । (असा तीन ओळींचा मो )

देयविज ।

यने ।

---

१ ब ४८ मध्यें पण लगेच फाडला आहे. २ असार बेगजें ३ जेधे. ४ पहा

ले २७२ श्री श १६०७ माग० शु० ६
ता २१।११।१६८५ इ

स्वस्ति श्रीराज्याभिषेक शक १२ क्रोधन नाम सवंत्सरे ( मार्गसी)र्श शुध सष्टी मदवासरे क्षत्रिय कुलावतंस सिं(हास)नाधीश्वर श्री राजा शंभु छत्रपती स्वामी याणी श्री अताजी सबदेव देशाधिकारी (लेख)क प्रांत

| | |
|---|---|
| श्री शंभु | वाइ यासि आज्ञा केली ऐसी जे प्रा मा।रीचा |
| भजनोत्कठ मो | +मुलकाचा तहरह लावणी सचणी प्रा मजकुरीचे |
| रेश्वर सुतनी | देसमुखाचे मतें करीत नाही येणेकरून किनेक |
| ळ्कहँ | रयेतीचा दिलसा राहात नाही हे गोस्टीने गेर |

काइदाच हे + तरी येसी गोस्टी सवथा न करणे जो तहरह करणे (तो दे)समुखाचे मते तहरह देऊन मुलक मामुर होये तें + + चो + + चे + कीद + रून हु रा य दि क + णे जाणिजे लेखना

रवाना छ ९ मोहरम

---

ले २७३ श्री

महाराज राजश्री——छत्रपती
स्वामी साहेबाचे सेवेसी

+ शी सेवेसी-सेवक आज्ञाधारक + ॥ दत्ताजी केशवजी नाईक देशमुख पा (वाइ) सेवसी कृतानेक विज्ञापना ता छ सावा(न) + तो साहेबाचे कृपा ग्स्टीकरून पा मजकुरीच + सेवकाचे वर्तमान यथास्थित असो विशेष ग- (न वरसी) महाराजाच स्वारियेवोवर चिकेवाडीच्या मुक्का (म पा) येतो होतो त्यावरी माहाराज कृपाळु होऊन आव + + देश कुलकर्णी यास सिरोपाऊ देऊन पा मज(कुरा)स जावयाची आज्ञा केली ते समयी सुयाजी विसा (ळ ये) ऊन उभा राहिला की माहाराजे आपणास वस्त्र देऊन दत्ताजी नाइकासमागमे रवाना करावे म्हणून हाली + त्यावरून साहेबी त्याचा करीना मनास आणून आज्ञा + + सुयाजी काही वतनास लायक नाही येसीयास + + लाइका तोडून सागावे तरी परगणा माहाल (वे)विराण जाला आहे लावणी संचणी जाली पाहिजे + + ये महसी जाऊन सालाबाद सालबसाल चालने तेणे प + + लाऊन मलकाची

येथील देशमुखीच वतन दत्ताजी केशवजी नाईक पिसाल व सूर्याजी फिरंगोजी नाईक पिसाल ( हर ) दु जणानी निमेनिमेप्रमाणे अनभवावे येसे आसता दत्ताजी केशवजी कथला करु लागला त्यास पूर्वी स्वामींनी वर्तमान मनास आणून निमे वतन सुर्याजी पिसाल याणी खावे निमे वतन दत्ताजी पिसाल याणी खावे येसे करून सुर्याजी पिसाल यासी पत्रे करून दिल्ही त्याउपरी अलीकडे दत्ताजी केशवजी याणे पुधरचे मुक्कामी हुजूर येऊन गेर वाका विदित करून सारे देश-मुखीची पत्रे करून घेतली येसियासी सांप्रत सूर्याजी पिसाल हुजूर आले आणि आपला करिना मागितला तो मनास आणून प्रा मजकूरचे देशमुखीचे निमे वतन यास करार करून देऊन पत्रे दिल्ही आहेत व दत्ताजी केशवजी याणे सारे देश मुखीची पत्रे करून घेतली आहेत ते रद केली असत आणि हाली सूर्याजी पिसाल याचे दुमाले निमे देशमुखीचे वतन केले असे तेणेप्रमाणे हे हरदू जण निमेनिमे-प्रमाणे आनभवितील येसियासी मौजे मजकुरी पेशजी सूर्याजी पिसाल यास इनाम होता तो मध कथलियामुळे त्याकडून दूर करून किले वैराटगडाकडे दिल्हा होता तो हाली किले मजकुराकडून दूर करून सूर्याजी पिसाल यासि इनाम करार करून दिल्हा आहे तरी तुम्ही यासी रुजू होऊन वसूल याकडे देत जाणे जाणिजे

इनाम व इकलवानिमा काये आहे व काये चालतें तो तपसिले हुजूर लेहोनु पाठवणें त्यावरून मनास आणून पेस्तर दुमालेची सनद सादीर होईल नेणेंप्रमाणें चालवणें सदरहू पाटिलकी मिरास यकाजीस लेकराचे लेकरी करून दिल्ही असे यकाजी मागे याचे पुत्रपौत्री हे मिरास वमाविस करून सावी जरी यकाजीस लेंक न जाले तरी याचे जावयान आपले सुसीनें यकानी पाटिलकी देईल त्याणे लेकराचे लेकरी सावी साहेबी यापमार्यों चालवावे यैसे केले असे तालिक लिहून घेउनु असल परतोन देणे छ ३ रजब पर्वानगी हुजूर मोर्तबसुद *मर्या। देयावेरा। जते।

पो छ ५ मिलहू

तेरीख १ तिसरा माहे रजब

रजब

बार सुद  सुरु सुद

---

ले. २७६ श्री श. १५९७ आश्वीन श १०

करण कीदीं करील रास्ती राजभाग देत जाईल व हमशाई गोत व चलुने जमा करून पाटिलकीचा महैजर वकाजीस करून देणे तालिक लिहुन घेउनु असल परतोन वकाजीस देणे छ ८ रजब परवानगी हुजूर मोर्तबसुद मर्या। देयविरा। जते।

रुजु सुरु
निविस
सुरु सुद

---

ले २७७ श्री श १५९७ आश्वीन शु १०
इ. स १६७५ सप्टंबर १८

माहाराज

मशहुरल हजरत राजश्री माहादाजी मामराज सुबेदार व कारकून हाल व इस्तकबाल सुभा ता मावल पती राजश्री सिवाजी राजे सुहूर सन सीत सबैन व अल्फ वकाजी फर्जंद साहेबाचा कदीम इतबारी फर्जंद याच्या बापाने साहेबांचे-थे कस्तमशागत केली आहे व वकाजीहि साहेब कामावरी कस्तमशागत बहुतच करितो याकरिता साहेब यावरी मेहरबान आहेती मेहरबानीने बक्सीस हि पावतो याउपरी बहुतच मेहरबानीने साहेबांचे मनीं आले की यास येक वतन करून द्यावे म्हणून त्यावरून मौजे साबगाव बु॥ ता कर्याती मावल येथील पाटिलकी सारी साहेबांच्या वडिलापासून का। कैलासवासी साहेब विकत घेतली आहे ते अजीरावेतो चालत आहे ते मौजे मजकूरची पाटिलकी (वकाजी फर्जं)द यास वतन मऱ्हामत केलें असे तरी पाटिलकी[1] मौजे मजकूर सारी याचे दु दुवाले करणे आणि पाटिलकीचे काम याच्या हाते घेत जाणे पाटिलकीस हकलवाजिमा व इनाम याच मोगतसर गावींचे पाटिलास चालवीत असाल तेणे माणे यास मोकरर करून देऊन सालदरसाल त्याप्रमाणे चा[2] चालवीत जाणे काजीस हे मिरास पाटिलकी सारी लेकराचे लेकरी दिल्ही असे हर साल नाजा ानदेचा उजूर न करणे याच सनदेवरून सालदरसाल लेकराचे लेकरी चालवीत जाणे व पाटिलकी कुणावांवियाची सेते सालाबाद असतील ते याचे दुवाले करणे ीदीं करील रास्ती राजभाग देत जाईल हमशाही गोत व चलुते जमा करून पाटिल कीचा मह्जैर वकाजीस करून देणे तालिक लेहोन घेऊन असल परतोन वकाजीस देणे छ ८ रजबु

---

१, २ अक्षर वेगळाले ३, ५ ट २८१ पहा रेघेच्या शेवटी आल्यामुळे दुबार पडला आहे ५ ले. पहा.

ले. २७८

श १५९७ आश्वीन व० २
इ. स. १६७५ सप्ट २५

श्री महादेव*

माहाराज

( पांच ओळींचा प्रतिपच्चद्र हा शिवाजीचा अष्टकोनी शिक्का. )

अज रख्तखाने राजश्री शिवाजी राजे साहेब दवाम दौलत हू ता यकाजी फर्जंद सुहुर सन सीत सबैन व अलफ चिदानद के तू साहेबाचा कदीम इतबारी फर्जंद पेसजी तुझ्या बापानें साहेबाचे थे कस्टमशागत व चाकरी केली आहे व तुहि साहेबापासी परवरा होऊन कस्ट-मशागती साहेब कामावरी करितोस त्याकरितां साहेब तुजवरी मेहरबान आहेती व मेहरबानीने तुज बकसीसहि

श्री शिवराजे द्र हर्षनिदान ।।न्य यक सुत मोरेश्वर मुख्य प्रधानें

देत असतात त्याउपरी हाली तुजवरी बहुतच मेहरबानीने साहेबाचे मनी जाहाले कीं तुज यक वतन करून द्यावे म्हणजे पाटील व कुणबी लोकात गोतात तू वर्तत आहेस यास हें वतन पाटिलकी जाहालिया गोतात इजत आहे म्हणून बाबदल मौजे सावगाव ग्रा ता का मावल बथील पाटिलकी सारी साहयांच्या वडिलांची का कैलासवासी साहेब विकत घेउनु आपली मिरासी केली आहे ते तधीपाधून आजीपावेतों मौजे मजकूरची पाटिलकी साहेबांची चालत आहे ते मिरास तुज वतन मरहमत केले असे तरी सारे पाटिलकीचे काम चालवीत जाणें आणि पाटिलकी सारी कमावीस करून खाणें हे वतन तुज लेकराचे लेकरी करून दिधले असे लेकराचे लेकरी खाणें साहेबाचे पुत्रपौत्री हे वतन चालवितील यास साहेबांचे पौसी कोण्ही खलल करील तरी त्यास श्री ‾‾‾ची आण असे पाटिलकी मौजे मजकूर सारी आजीपासून तुझे मिरास जाली साहेबास निसबत नाही [1]जाणिजे [2]परवानगी हुजूर [3]मोर्तब सुद [6]मर्या । देयसिरा । सेत । [4] हुजु सुद

तेरीख[5] १५ माहे रजब निवेस

रजब सुद सुरू[7]

---

ले. २७९

श्री

श० १५९७ आश्वीन व. २
इ. स १६७५ सप्टेंबर २५

( शिवाजीचा प्रतिपच्चद्र हा शिक्का. )

अज रख्तखाने राजश्री शिवाजी राजे साहेब दवाम दौलत हू ता बजानेबु कारकुनानी हाल व इस्तकबाल व देशमुखानी ता का मावळ सुहुर सन सीत

---

१-५ हा पांचांचीं अक्षरें स्वतंत्र व वेगवेगळीं आहेत ६ लेखांक २८२ पहा.
* हीं ४ अक्षरें बालबोध आहेत. ७ लववर्तुळ.

श्रीशिवराजें — सचैन अलफ चिदानद के बकाजी फर्जंद साहे-
द्रहर्ष निदान ॥ ७म — बाबा कदीम इतबारी फर्जंद याचे बापानी साहे
वसुत मोरेश्वर — बांचेथे कस्टमशागत केली आहे व बकाजीहि
मुख्यप्रधान — साहिब कामावरी कस्ट मशागत बहुत करितो पा

करितो साहेब यावरी मेहरबा ( न आहेती ) मेहरबानीने बक्सीसहि पावतो याउपरि बहुतच मेहरबानीने साहेबाचे मनी जाले की यास यक वतन करून द्यावें म्हणून त्यावरून मोजे सायगाऊ ता। ता। या मावल येथील पाटिलकी साहेबाची फा फैलासवासा साहेब विकत घनली आहे ते आजीपावेतों चालत आहे ते मोजे मजकूरची पाटिलकी सारी बकाजी फर्जंदास वतन मरहमत केले असे तरी पाटिलकी सारी सारी याच दुवाले करण आणि पाटिलकीचे काम याचे हातें घन जाण पाटिलकास इनाम व हकलवाजिमा बाबा मोरतबर गावीचे पाटिलास चालवीत असाल तेणेप्रमाणें सुभा सुज मोकरर करून सनद देतील तेणेप्रमाणे सालदरसाल चालवित जाणें बकाजास हे पाटिलकी सारी लेकराचे लेकरी मिरास करून दिल्ही असे हर साला ताजा सनदेचा उजूर न करितां याच सनदेवरून साल दरसाल लेकराचे लेकरा चालवणें व पाटिलकी सेते कुणबावियाची सालाबादची असतील ते याचे दुवाला करण कीदीं फसात जाइल रास्ती राजभाग वसूल घेत जाणे व हमसाइ गोत व चलने जमा करून बकाजीस हे पाटिलकीचा महजर करून देणे तालिक लिहून घेउनु असल बकाजीस परतोनु देणे [1]परवानगी हुजूर [2]मोर्तब सुद मर्या । देयविग । जते ।

रुजु सुरु
निवीस
सुरु सुद

तेरास[3] १५ माहे रजब
रजब

कर्यांती मावल येथील पाटिलकी सारी साहेबाच्या वडिलापासून कारकीर्दी केलासवाशी——साहेबी विकत घेतली अजीपावतों चालत आहे तें मौजे मजकूरची पाटिलकी सारी बकाजी फर्जंद यास वतन मरहमत करून दिधले असे तरी पाटिलकी मौजे मजकूर सारी याचे दिमतीनें करणें पाटिलकीचें काम याचे हाते घेत जाणे पाटिलकीस इनाम व हक लवाजिमा बाबा मोरलेसर गावीच्या पाटिलास चालवीत असाल तेणेप्रमाणे यासि मोकरर करून देऊन साल दरसाल त्याप्रमाणे चालवीत जाणे बकाजीस हे मिरासी पाटिलकी सारी लेंकराचे लेंकरीं दिल्ही असे दर साल ताजा सनदेचा उजूर न करितां याच सनदेवरून साल दर सल लेकराचे लेकरी चालवीत जाणे पाटिलकी निसबती कुणब्याची सेते लावाबाद असतील तें याचे दुमाले करणें कीर्दी करील रास्ती राजभाग देत जाइल व हमशाही गोत व वतने जमा करून पाटिलकीचा महजर बकाजीस करून देणें तालिक लिहून घेऊन असल बकाजीस परताऊन देणे म्हणऊन सुदस्त सादर जाले असे तरी सदरहू लिहिलेप्रमाणे राज राजश्री——साहेबाचे सुदस्त बहुकुम मौजे खानगाव ता कर्याती मजकूर येथील पाटिलकीचें काम मा बकाजी फर्जंद याचे हाते घेऊन हक लवाजिमा इनाव बाबा मोरलेसर पाटिलास असल तेणे-प्रमाणे चालवणे ताजा सनदेचा उजूर करीत नव जाणे माइले लेकराचे लेकरी पाटिलकी मिरासी सातील हाली हमशाही गावीचे पाटील व वतने जमा करून पाटिलकीचा महजर करून देणे असे ये बाबे राजश्री——साहेबाचे सुदस्त कर्याती मजकुरीचे नावे अलाहिदा आहे तेणेप्रमाणे यासि महजर करून देणे तालीक घेऊन असल परताऊन देणे छ १५ माहे रजब १ मोर्तब सुद मरत। बतुद। ( असा

( बारोळा व चार ओळींचा अस्पष्ट पा। १७ रजब दोन ओळींचा[१] मोर्तब )
शिक्का पैकीं दोन ओळी—
माहादाजी सा। मराज। ) ——

ले. २८१ श. १५९७ कार्तीक शु २
इ स १६७५ आक्टो. ११

( महजर[२] ) श्रीशके १५९७ राक्षस नामसंवत्सरे कार्तीक सुध २ द्वितीया वार आदित्यवार तदिनी महजर लिखिते हाजीर मजालस सभा बितपसील

| | |
|---|---|
| राजश्री माहादाजी सामराज सुभेदार ता मावल | राजश्री उधोराम सरमजमुदार ता मावल |
| राजश्री माहादाजी नरसिंह परभु हवालदार का मावल | राजश्री सोनाजी तमाजी परभू मजमुदार का मावल |
| जैतजी नाइक बिन मल्हारजी नाइक करजवणे देसमुख का मावल | ( आ )गाजि ज्ञानदेऊ लाडे देसकुलकर्णी कर्यात मावल |
| नाइकजी बिन चापाजी शावडा | जाऊजी बिन बर्जोजी सुरवा व माऊजी |

१ ले २८१ पहा २ ले २८२ पहा

मोकदम मौजे वडद्रे का मावल
\+ +
\+ +
\+ + विजे मोकदम
\+ जी लोणकर
मोकदम ( मौजे ) कोपरे
रामजी धरजवणी मोक
दम मौजे फिरक्टेवाडी
तानाजी पोकला मोकदम
मौजे धाइरी प्रा मा
बकाजा फजद व मोरोजी
धुला मोकदम मौजे नादेड
कान्होजी धावडा मोकदम
मौजे कोठे का मा
भिकाजी बागट मोकदम
मौजे खुर्द सावणे
तुकोजा नलगा मोक
दम मौजे वडगाऊ खुद
निबाजी मोकदम मौजे
कोढवे खुद
मिराजी मुसलमान मोकदम
मौज कातरज
मालजी पा मोकदम मौजे
कोढवे बुा
बाबाजी कानवडा व
सिऊजी धुला मोकदम
उडरी
बायाजी कानडा । सिऊजी धुला
भिऊजी चोंध्या व परसोजी
विगला मोकदम मौजे भुगाऊ
बाबाजी नरसिगराऊ व
येसवतराऊ सितोले मोक
दम मौजे लवले का मजरूर
रामजी घोरारा मोकदम

बिन विठाजी जोरी ( मोकदम ) + +
बाजे मोकदम पायेगुडे
मोकदम मौजे अ + +
मल्हारजी सिरडी मोक
दम मौजे गोन्हेबुा
गिरजोजी बिन सूर्याजी
मते मोकदम मौजे खडकवा
सले
चिमणाजी बापूजी मोकदम
मौजे नादोसी
मालजी राजवडा मोकदम
मौज न हेंद्दाये पा मा
रेसोजी चिधा मो मौजे
आबेगाऊ खुद
सोनाजी धन्हार मोकदम
मौजे वारजे
सिऊजी मोकदम मौजे वड
गाऊ बुा
बाबाजी माकदम कोढलकर
व पिलाजी पोकला व बा-
जी हेन्द्रा मोकदम मौजे
आबेगाऊ बुा
निबाजी मोकदम मौजे
कोढवे खुर्द
जादजी मान्हेरा मोकदम
मौज भुकुम का मा
रामजी दगडा मोकदम
मौजे बावधण बुा
होनाजी वेडा मोकदम
बावधन बुा
साऊजी पाटील धन्हारा
मोकदम मौजे हिंगणी बुा
हिरोजी तनपुरा मोक

मौजे कोथरुड
बाबाजी पाटील व जाउजी
पाटील व भीक पाटील
मोकदम मौजे येरे



बापूजी सवार मोकदम
मौजे चाये



दम मौजे माडवी सुद
रायाजी रानवडा नामजाद
मौजे नाये

या हुजूर महजर मारदनी मौजे सावगो कयाती मावल सुा सीत मयेन अल्फ महजर केला येसा जे पहिली पाटिलका कदीम लोहकराची हाती त्यानी पायेगुडे देसमुख यासि विकिली पायेगुडियानी राजश्री——साहेबास विकत दिल्ही राजश्री साहेबी बकाजी फर्जद यासि बकसीस दिल्ही या कागद राजेश्री साहेब छ ८ रजब चा सनद                                                    बकाजी फर्जद साहेबाचा कदीम इतबारी फर्जद याचे बापाने राजश्री साहेबाचेथे करम्मशागत केली आहे व बकाजीहि साहेब कामावरी करटमशागत बहुत करितो याकरिता साहेब यावेरी मेहरबान आहेती मेहरबानीने बकसीसहि पावतो वेपेरी बहुतच मेहरबानीने साहेबाच मनी जाले का यासि येक वतन करून द्यावे म्हणून त्यावरून मौजे सावगो सुा ता कयाती मावल येथील पाटिलकी साहेबाची कदीम केलामवासीसाहेबी विकत घेतली आहे ते आजीपावतो चालत आहे ते मौजे मजकुरीची पाटिलकी सारी बकाजी फर्जदास वतन मरहमत केले असे तरी पाटिलकी सारी याचे दुवाले करणे अणी पाटिलकीचे काम याचे हाते घेत जाणे पाटिलकीस इनाम व हकलवाजिमा बाबा मोकलेसर गावीचे पाटिलास चालवीत असाल तेणेप्रमाणे सुबाहून मोकर(र) करून सनद देतील तणेप्रमाणे साल दर साल चालवीत जाणे बकाजीस हे पाटिलकी सारी लेकराचे लेकरी मिरास करून दिल्ही असे दर साला ताजा सनदेचा उजूर न करणे याच सनदेवरून साल दर साल लेकराचे लेकरी चालवणे व पाटिलकी निा सेत कुणबियाची सालाबादची असतील ते याचे दुवाले करणे कीर्दी करीत जाईल रसती राजभाग उसूल घेत जाणे व हमशाइ गोत व बलुते जमा करून बकाजीस हि पाटिलकीचा महजर करून देणे येणेप्रमाणे राजेश्री साहेबाचा कागद सादर जाला यावरून बकाजी फर्जद यासि मौजे मजकुरीची मोकदमी लेकराचे लेकरी करावी हक उतरत जे आहे ते खावे लेकराचे लेकरी पाटिलकी करावी हा महजर सही मोकदमीस मोगलगा बि तपसील

इनामती कास रुके चोवीस ॥-
तेली याति जे दिवसी घाणा कीर्दी
होईल ते दिवसी तुयास दरोज तेल
४॥९ नव टाक

मिरासीचे पाटिलकीचे सेत कुण-
बियाचे थल आहे सेत पैकी कास
रुके बारा ।-

गावी टाले सणी व लग्न जाहले
तरी पाच सोवरियाची वाटी येक
५ १

नामर करावा सणाच्या सणास सण
प्रमाणे मान द्यावा वाजपणे अधि मान
द्यावा १

गावजत्रा केली देवाची तेरी
सोडाचे फले द्यावा
१

बलुते वाजे वाचा गावीचे जेणे
प्रमा रावत आहेत तेणेप्रमाणे
रावावे ला

वाडा मोकदमीचा
उतरदक्षण गज पूर्वपश्चमगज
येक सेवसि १२० येकसे ११५ पथरा
असे
येणेप्रमा वाडा असे
सेव पत्री द्यावी
होलीस पोली द्यावावी

परीट नाहावी गुरव सुनार
१ १ १ १
चामारजुनी कुभार लोहार
उन्हाला१ १ १
१
पाउसाला पुती तराल कोली माहार
१ १ १ १
बाकी

सदरहू महजर यकाजी फजद यासि करून दिल्हा असे यासि हिलाहरकती करील तो दिवाणीचा खोत गोताचा गुन्हेगार पाटिलकी मिरास यकाजीस लेकराचे लेकरी करून दिल्ही असे यकाजीमागे याचे पुत्रपोत्री हे मिरास कमावित करून खावी जरी यकाजीस लेक न जाले तरी याचे भावबंद ज्याला आपले खुसीने यकाजी पाटिलकी देईल त्याणे लेकराचे लेकरी खावी येसा राजश्री साहेबीहि या हुकूम-प्रमाणे चालवावे येसे केले असे राजेश्री साहेबी यकाजीस खुर्द खत करून दिल्हे असे तेथे लिहिले आहे की हे वतन तुज लेकराचे लेकरी करून दिल्हे असे लेकराचे लेकरी खाणे साहेबाचे पुत्रपौत्री हे वतन चालवितील याचे साहेबाचे बोसी कोण्ही खलेल करील तेरी त्यास श्रीची आण असे येसे लिहिले असे तेरी जो हरकती करील त्यास आण असे व महजर सही

गोही

अबदे भट टकार जोशी
उमाजी बिन णाणोजी
बालपुडा चौगुला

रायाजी विठल व मल्हार
दादो सातपुना कुलकर्णी
हिरोजी मद्दीरगा वाग्या-

| | |
|---|---|
| | वाडी |
| आऊजी बिन वाजी | चाहुजी बिन ल्हे कोंडाजी |
| नवपणा वाग्यावाडी | बारवस्कर वाग्यावाडी |
| राम सुतार बिन क्न | घोप वरठा बिन धाप वरठा |
| सुतार मुतालीक सुनार | परीट मिरासी |
| मौजे कम —○ वाक्स किकर | मोगरी |
| मोत महाला बिन याज | बाबाजी बिन कालोजी |
| महाला मिरासी मौजे मजकूर | तेली मिरासी मौजे मा। |
|  भारता | बाहार |
| | कान्हा बिन वादनाक व गोदा बिन येल्ह माहार वीतीकार माहार |
| | इलादोर निशाणी |
| तेरीख १० माहे रजेब रजब | सुहुर सन सीत सबैन ९ अल्फ |
| मोतव सुद | ( जोडावरील शिक्का हा ३ ठिकाणीं दोन दोन असा सहादां आला आहे ) |

---

ले. २८२

जायिता मिरासीच्या सनदा असला———
मौजे खांबगाव———

असलेत १ महजरनामा ( ले. २८१ पहा )

नाकिलेत १ राजश्री साहेबांची सनद कीं बराजी फर्जंद यास खांबगावीची पाटिलकी दिल्ही म्हणौन आपली सनद करून दिल्ही

---

१ हा महजराच्या मूळ प्रतीबरोबर त्याची नक्कलहि होती. मूळ कागद मधून क्वचित् फाटलेला किंवा जेथे त्यांत स्पष्ट शब्द उमगला नाहीं तेथें नक्कलेवरून दुरुस्ती केली आहे मारभींच्या 'बाबाजी पाटील येरे' येथपर्यंतच्या नांवांची नोंदहि नक्कलेवरूनच घेतली आहे. स १८ ते. २१ मध्यें हा महजर अपुरा आला आहे.

तालकेत १ सुभेदारास व देसमुखास व मोकदमास राजेश्री साहेबी लिहिले आहे की बकाजी फर्जंद यास सावगावीची पाटिलकी दिल्ही आहे महजर करून देणे म्हणोन सनद

असेलेन १ सुभेदारास राजश्री साहेबी लिहिले आहे की मौजे सावगा-

ता १ असल वीची पाटिलकी बकाजी फर्जंद यास दिल्ही म्हणोन

१ तालिक सनद रा। साहेबांची

सिक्का होणे असे ( ले २७७ पहा )

तालिकेत १ जाचिता मोकदमी मौजे सावगाऊ मावल

१ माहादाजी नरस परभु हवालदार का। मावल यास माहादाजी सामराज सुभेदार यानी लिहिल ( असे ) की सावगावीची पाटिलकी रा। साहेबी बकाजी फजद यास दिल्ही असे महजर ( करून ) देणे म्हणोन लिहिले असे

६

असलेत १ सांवगावीचे सेत इनामतीचे कास रुके ८६ ( ब )काजी फजद याचे हुमाले करणे म्हणेन तरी स्वामीनी जेथे + + लिहिले असे रा। माह

मौजे नादेड

असलत १ महजरनामा

तालिकेत १ महादाजी निर परभू हवालदार का। मावल याम महादाजी सामराज शुभेदार यानि लिहिले आहे की रा। साहेबी बकाजी फर्जंद यास मौजे नादेडीची पाटिलकी निमे दिल्ही असे त्याचे हुमाले करणे म्हणोन लिहिले

येही प्रथम १ कि॥ सनद देसमुख देसकुलकर्णी यास माहादाजी सामराज

लिहिलें होतें १ शुभेदार येही लिहिले असे की मौजे नादेडीची पाटिलकी निमे रा। साहे( बी ) दिल्ही असे तुम्ही महजर करून देणे म्हणोन

असलेत १ कि॥ सनद सारे मोकदम का। मावलातील माहादाजी सामराज याणी लिहिले आहे की नादेडीची पाटिलकी निमे रा। साहेबी दिल्ही आहे तुम्ही महजर करून देणे म्हणोन लिहिले असे

१ कि॥ सनद राजश्री साहेबी लिहिले आहे की बकाजी फर्जंद यास मौजे नादेडीची पाटिलका निमे विकत होन यकसे होनास विकत

---

१ सुभेदारास लिहून वर फार माहून रद्द केलें आहे ले २७५ चीच एक नकल चिनशक्याची आहे मजकूर अगदीं सारखा असल्यामुळें ती घेतली नाहीं

( दिम्ही ) असे म्हणोन बकाजी फर्जद याचे नावे केली असे
तेरीस छ २१ सवाल सुरु आया

५

असलेत १ राजश्री माहेची बकाजी फर्जद यास लिहिले असे की तुम्हास
++ माफ असे म्हणोन लिहिले असे सनद छ ११ शावान सन
सीत +

१४

तालिकेत १ रा मोरो त्रिमल पेशवे येही रा बकाजी फर्जद यास लिहिले +
की तुम्हास वतन रा [ सा ]हेबी करून दिल्हे बहुत थरे केले
त्याचे सनदेवरी सिके निशाणे करून दिल्ही असे तरी म्हणोन
लिहिले ++

१५

---

ले २८३ श्री श. १६१८ कार्तीक शु १
इ स १६९६ आक्टो. १६

राजश्री शकराजी माहादेव सुभेदार व कारकून हाल व
इस्तकबाल सुभा मावले ता लोहगड गोसावी यासे

छ अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य सेवक शंकराजी नारायण सचीव नमस्कार सुहुर सन सबा तिसेन अलफ शकराजी बिन बकाजी फर्जंद मोकदम मौजे सावगाव ता कर्याती मावल हुजुर येउनु विदित केले की मौजे मजकूरची मोकदमी पेशजी लोहकरियाची होती लोहकरियाजी पायेगुडे देशमुख ता मजकूर यासी विकत दिल्ही ते कितेक दिवस भोगवटा अनुभवीत होते पायेगुडियापासून पाल्हिकी कैलासवासी राजश्री माहाराजे साहेबी विकत घेतली तो ते साहेबाचे कारकीर्दीपासून कैलासवासी राजश्री छत्रपती स्वामीपावेतो वतन भोगवटा चालत होता येसियास आपला बाप बकाजी फर्जंद याणे राजश्री कैलासवासी स्वामीपासी करतमशागतीसेवा बहुत दिवस केली त्यावरून कैलासवासी स्वामी कृपाळू होउनु मौजे मजकुरची मोकदमी आपला बाप बकाजी यास वतन लेकराचे लेकरी अजरामरहमत केले ते आपला बाप बकाजी यास अनुभवीत होता कालेकरून

---

१ या आवस्थावरून एकाद्यास सनद करून द्यावयाची म्हणजे तिच्या प्रती किती व कोणाच्या नांवाच्या करा असावयाच्या याचा अदाज येईल.

मृत्य पावला त्यामागे वतन आपण अनुभवीत होतो दरम्याने कारकीर्दी कैलासवासी राजश्री मोगलाची फिसाद जाली तमाम विलायती खराब होउनु परमुलकास गेली आपणहि परागदा होउनु गेलो असता मागे गोरोजी लोहकरा याणे स्वामीपासी येउनु गैरवाका करीना विदित केला की वतन आपले आहे आपले दुमाले केले पाहिजे त्यावरून स्वामीने त्यास पत्र करून दिल्हे तरी वतन आपले आहे कैलासवासी राजश्री-छत्रपती स्वामींची पत्रे व गोताचा महजर आपणापासी आहे तो मनास आणून आपले ( वतन ) आपले दुमाले केले पाहिजे म्हणउनु विदित केले व राजश्री कैलासवासी स्वामींची पत्रे व गोताचा महजर दखल केला त्यावरून वतन शकराजी फर्जंद याचे तहकीक कलो आले गवरोजी लोहकरा यास निसबती नाही गैर वाका हकीकत सागोन दुमालपत्रे करून घेउनु (' दिले ) आहे त्यास दूर करून वतन मोकदमी शकराजी बिन चकाजी फर्जंद याचे दुमाला केले असे तरी तुम्ही गोवरोजी लोहकरा यास दूर करून पाटिलकीचे वतन शकराजी मजकुराचे दुमाले करणे हकलाजिमा व मिरासीचे सेत दर बाग व माजे कायेदा जो काये पुरातन चालिला असेल तो दार याचे वशपरंपरेने चालवणे गवरोजी लोहकरा हिला हरकत करितील तो दिवाणीचा गुन्हेगार त्यास दूर करणे सनदेची श्री तालीक लेहोन घेउनु असल सनद भोगवटियास पाटील मजकुरा-शकराजी पासी देणे छ २९ रबिलोवल 'सदेश समक्ष पत्रा । वधिरय । मार्ति[१] । नारायण

सुरु सुद

---

ले. २८४

श. १६२१ माघ वद्य ४
इ. स. १७०० जाने २८

( सहा ओळींचा तीन वेढ्यांचा वाटोळा शिक्का असा- )

० श्री ◡ । प्रतिपच्चंद्रलेखे । व वर्धिष्णुर्विश्वव । दिता शिवसूनोरिय । मुद्रा राजाराम । स्यराजते ।

स्वस्तिश्री राज्याभिषेक शके २६ प्रमाथी नाम संवत्सरे माघ बहुल चतुर्थी रविवासरे क्षत्रियकुलावतंस श्री राजाराम छत्रपती याणी शकराजी बिन चकाजी फर्जंद मुकादम मौजे सांवगाव ता। कर्यात मावल यासी दिल्हे वतनपत्र ऐसे जे तुम्हा चाय चकाजी फर्जंद याणे तीर्थरूप कैलासवासी राजश्री———स्वामीची सेवा

---

२ जोडावर हाच मोर्तब दोनदां उठविला असून शिक्का व मोर्तब एकाच आकाराचे आहेत. १ ' सदेश समक्ष ' असें हें प्रथमच येथें आहे, ' निदेश समक्ष ' असें सर्वत्र आढळतें.

यत्ननिष्ठेने केली याकरितां त्यावरी कृपालु होऊन मौजे मजकूरची मोकादमी अजराह मऱ्हामत करून दिल्ही त्याप्रमाणें आजीवरी भोगवटा चालत आला आहे येसियासी अलीकडे स्वामींनी सोनजी फर्जंद यासी मौजे मजकूरची मोकादमी दिल्ही होती त्यारी तू हुजूर येऊन वर्तमान विदित केले व कैलासवासी स्वामींचीं पत्रें दाखविलीं त्यावरून तुझा मोकादमी तुज करार करून दिल्ही त्याउपरी मोरोजी लोहकरे हुजूर येऊन विनंति केली की मौजे मजकूरची मोकादमी पुरातन आपली याकरितां राजश्री शंकराजी पंडित सचीव याणी आपणापासून दिवाणांत पैक घेऊन निमे मोकादमीचा पत्रें करून दिल्ही आहेत तेणेप्रमाणें स्वामींना चालवावया आज्ञा केली पाहिजे म्हणोन विनंत केली त्यावरून मौजे मजकुरचा मोकादमी अमा ++( हर ) हुजनास हुजुर आणून वर्तमान मनास आणितां मौजे मजकुरची मोकादमी ++ ( साहे)बी पायगुडियापासून खरीदी करून घेतली त्यापासून तें वतन ++ होतें म्हणोन कैलासवासी स्वामींनी तुझा बाप बकाजी फर्जंद यासी अजराह मऱ्हामत करून दिल्हे आहे लोहकरियासी या वतनासी अर्थार्थी संबंध नाहा येसे ++++ स्वामींनी लोहकरियासी दूर करून मौजे म +++ करून हे वतनपत्र करून दिल्हें आहेत ++ पुत्रपौत्रादि *वंशपरंपरेने ++++ पत्रें दिल्ही आहा +++ ते पत्र दिल्हे आ +

ले. ७८५ श्री श १६६६ चैत्र शु १०
इ स १७४० एप्रील ६

सरकार दुरनी माहाल वाडा पहिला याणी मा अनाम देशमुख देशपांडे ता कर्यात मावल सुा सया आर्बैन मया आलफ मौजे सांवगाव ता मजार येथील मोकदमी सरकारची पुरातन आहे त्यास बकाजी फर्जंत याजवर कृपालू होऊन आजरामरामत केली त्यास तो मृत्य पावला त्यावर त्याचा पुत्र सकराजी पाटिलकी करीत होता येश्यास त्याजलाहि देवआज्ञा जाली त्यास अगदी पुत्रसंतान नाही याकारितां गोदाइ कोम सकराजी फरजत इच्या वोट्यांत खडोजी भोसले वाडिया तील मूल यास घालून मोकदमीस आधिकारी केलें आसे तर पूर्ववत मो याचे हातें पाटिलकीचे कामकाज घेऊन इनाम इकलाजिमा कानु कायेदे कुली यांजकडे चालऊन पुत्र पौत्रादि वंशपरंपरेने चालवणें प्रति वर्षी नवीन पत्राचा आक्षेप न करणें या पत्राची प्रती लेहून घेऊन हे पत्र भोगवटियास याजपासीं परतोन देणें * जाणिजे छ ९ रबिलावर *लेखनसीमा * सही

* हुजु

*२ जोडावर शिक्के दोनः- ले, खनसी, मासमुछ, सति, असा चार ओळींचा व पिंपरी आकाराचा. * हीं चारहि अक्षरें भिन्न असून 'सही' ह्यांतील स चाल्बोध आहे

ले २८६ श १७३१
इ स. १८०९

श्री असल बी नक्कल

सिका

अज रवारी राजश्री मनोहरगीर किले सिंहीगड ता जानोजी बिन बहिरजी पा। भोसले फर्जंद मोकदम मौजे सांबगाव ता। कर्यात मावळ घेरा किले मजकूर सुा आशर मयातेन व अल्फ तुम्ही पुणियाचे मुकामी येऊन विनती केली की मौजे मजकूर येथील मोकदमी दरोबस्त लोहोकऱ्याची त्याजपासोन पायेगुडे देशमुख ता। मजकूर यांणी विकत घेऊन काही दिवस भोगवटा केला नतरी श्रीमत कैलासवासी थोरले माहाराज छत्रपती याणी पायेगुडे याजपासून सोडवी घऊन यशाजी फर्जंद भोसले यांस बक्षीस देऊन पत्रे करून दिल्हा व ता। मजकूरचे देशमूख व देशपांडे यांस गोतमहजर करून देणे विशई आज्ञापत्रे दिल्ही व त्याजवरून ता। मजकूर व जमीदार याणी गोतमहजर करून दिल्हा त्याप्रमाणे मोकदमीचा भोगवटा बकाजी यास पुत्र तकगाजी त्यास पुत्र सडोजी येकूण तीन पिढ्या आनभवीत आले पुढे सडोजीचे नकल जाहाले त्याची आई गोधाबा होती तिणे श्रीमत कैलासवासी शाहू माहाराज छत्रपती यास सातारियाचे मुकामी जाऊन

पाहिजेत म्हणोन त्यावरून मनास आणिता पूर्वी बहाजी फर्जंद याम श्रीमत कैलास-वासी माहाराज यांणी पायेगुडे याजपासून मोकदमी विकत घेऊन बत्तीस दिल्ही त्याचा भोगवटा तीन पिढ्या चालता सहाजाने नकल जाहाले तेव्हा गोधाइ पाटलीण इणे सातारियाचे मुकामी श्रीमत कैलासवासी शाहू माहाराज यास अर्ज केला त्यावरून तुह्मा आजा सडोजी यास महाराजानी समक्ष आज्ञा केली की मौजे मजकुरास जाऊन मोकदमीचा आनभव करणे नंतरी तुह्मा आजा मौजे मजकुरास येऊन मोकदमीचा भोगवटा चालऊ लागला गोधाइ मृत्य पावला सडोजीपासून तुम्हापावेतो तीन पिढ्या भोगवटा चालत आला व मागील कागदपत्र जने होते ते गाहल जाहाले असे ध्यानास आले त्यावरून तजवीज रुजाऊ होऊन दुमालपत्र भोगवटियास करून दिल्हे असे तरी पेशजीपासून माकदमा व कानु काइदे व मिराशी शेते व इनाम पाशाडी सुधा वगैरे भोगवटा चालत आला असल्यास तुम्ही व तुमचे पुत्रभावसुधा पुत्रपौत्रादि वशपरंपरेने आनभव करणे ये बाब तुझे माथा शेरणी रुपये १०० करार केले ते पोता जमा असत जाणिजे छ ७ मोह रम मालव असे

---

छे १८७ २० नाशीक- धर्माधिकारी श १५२७ श्रावण शु १ ता ७।७।१६०५ इ

( अष्टकोनी फारसी शिक्का )

अज रहतखाने खुदावंद मलिक सक मलिक अंबर मुली दयाम दौलत हू बजानेब कारकुनानि हाल व इस्तकबाल मामले गुलशनाबाद बिदानद सुा सन सीत आलफ बालभट बिन महादभट जोसी सो कसब नाशीक हुजूर मालूम केले जे आपणासी इनाम दर सवाद कसबे मार या नरतयाती व सिहाडी ( मु ) पैकी

| | | |
|---|---|---|
| बेरीज | वजा | दरवफते मीदवजा |
| तेल | सबजी | ८८५ |
| ८८१ | ८८२॥ | |

या हुजती भोगवटा तसरुफाती चालिले असेली तेणेप्रमाणें चालवीजे भोगवटियाचे कागद गुम जाले याचा उजूर न कीजे तुम्ही तालीक घेउनु असली फिराऊन दीजे मोरतब सुद ( फारसी मोतब )

रुजु सुरुनी

तेरीख २९ सफर  बार सुद

---

ले २८८

श १५३५ माघ व. १३
ता. २७।१।१६१४ इ.

शके १५३५ परमादी नाम सवछरे माघ वदि तेरस ते दिनी फुलाइंस सोनभट बिन हेम जोसी मुले मौजे धासरुली मामले गुलसनाबाद सा अर्वा असर अल्फ लेहोनु दिधल ऐसे जे तु आपली सून तुझा भ्रतार गगाजी तो निवेतला तु कासीयात्रेहुन आलियावरी आपणापासि अनवस्त्र मागो लागलीस आपण नेदू च यावरी कलहो जाला त्रिमकारा वेव्हार गेलो तेथे बहुती ब्राह्मणी अनवस्त्र आपणाकडुन देविले यावरी येक वाट न पडेच म्हणौनु तुज दिधले नाही यावरी तु हुजुरु जाउनु हजरती मा——साहेबाचे गुदस्त कारकुनास आणिले जे जी मरे तोवरी अनवस्त्र देवणे यावरी आपणास तलब करुनु ठाणियासि आणिले मग कारकुनी व बहुती नेमू केला जे प्रतिवरुसी तुज देणे

नख्त लुगडिया कारणे प्रता(प) गला मण बारा ॥॥=
चवल देणे

ता

| | |
|---|---|
| गहू | चणे |
| ६२ | ६१ |
| मसूर | जोरी |
| ६१ | ६४ |
| नागली | |
| ६४ | |

येणेप्रमाणे देविले असे हे आपण कबूल असो आपण पुत्र ६ दसावत सोनभट शदीस॥ सोनभट

दाऊया  मानजी
बालाजी  बापूजी
रामाजी दाम्हुन  देशपत बापूजी अमसया

---

१ ६ सन याठयोध व येरयेगळे असर आहे.

ईही मिरोनु तुज प्रतिवरुखी देत जाणे यामधे जो मिरासी साइल तो देत जाईल तू ह्यात असतील तोवरी देत जाणे हे साउनु तुवा गोदा तीरी राहोनु गगास्नान करुनु असणे याति अनसारिखे करीन(=ल) तो दिवाणीचा गुन्हेगार बहुता ब्राह्मणाचा अनाई हे लिहिले सही मोंगील कागद रदी

गोही

| | |
|---|---|
| आपाजि विस्णुकुल | गोपाजि अनत कुलकरणी |
| करणी मामलेदार | मा मजकूर |
| मोकजी नयेकवाडी | सोजभ भट को |
| अतो हरवा कुलकर्णी | येसाजी मगु |
| कसय नासीक | नरसी (?) |
| गिरमाजी भ॰ डिगरे | सानाजी विस्णु |
| प्रतप्रमाणे साक्ष | पत्रप्रमाणे साक्ष अताजी |
| रामाजी त्रियक सो | दिवाकर कुलकर्णी मौज |
| नासीक | पासरुली |

---

ले. १८९

श १५४४ भाद्रपद व. ५
ता १५।१।१६२२ ई

अज रस्तखाने खुदायेवद खाने अजम मलिक शर्फ मलिक अंबर सुली दयाम दौलत हू बजानेबु कारकुनानी व देसमुखानी मामले गुलसनाबाद बिदानद सुा सलास असरन अलफ भ॰ जुनारदार कसबे नासीक मा मजकूर मालुम केले जे आपण गोदा तीरी स्नानसध्या करुनु साहेबासी दुा दउनु असता आपणास सिहस्तपटी दर सिहस्ती माफ आहे ये बाबे या माफर्ने ब सिके खासे आहे व साहेबचेहि खुर्द खत आहे हाली सिहस्त हो(ये)उनु गुदरला कारकून ताजे खुदखताचे उजूर करिताती म्हणौउनु मालुम केले तरी हाली सिहस्तपटी होइल त्यासी भ॰ मजकुरासी सिहस्त पटीची तसवीस ने दीजे बा फर्मान व खुर्द खत पेसजी माफ असेली तेणेप्रमाने चालवजि तसवीस ने दीजे नवी जिकीर न कीज मा धाराजी सारगधर सदा बजी म आसे म्हादजी छ १९ जिलकादी

नासीक

---

१ अक्षरें वेगवेगळीं आहेत म्हणजे ज्याचें त्यांनीं स्वाक्षरा केलें आहे. २, ३ अक्षरें मार्गेपुढें झालीं आहेत.

लें. २९१

श १५५० माघ व २
ता. ३०।१।१६२९ इ

सके १५५० विभव सवछरे माघ वदी २ सुक्रवार तदिनी फुलाइ लेकी गोविद प्रभु जुनारदार धर्माधिकरणी का मजकूर इणे आत्मसुस लेहोन दिधले येसे जे आपली तकसीम का मजकुरीच्या धर्माधिकरणाची निमे व सुदरनारायेण बाहेरील व गावातील घरीचा देऊ यांची तकसीम आपली सतत्र यापैकी आपला पुतन्या माहादप्रभु विन बालप्रभु धर्माधिकरणी हा आपणास आपले तकसीम पैकी सालिम्या मोइन टके २० वीस दरसाले देतो मे याचे माहाद प्रभूचा कागद निस्याण ही तुझे व आपले नाव आपणापासी आहे तेणेप्रमाणें तू व आपण हर दोघी जणी सात आहो आजी तागाईत चालत आले आहे येस्थास मज म्हातारपण आहे घरे घाइट मज जालियावरी सदरहू आपली मोईन टके वीस २० माहाद प्रभु मज देत आहे तेपैकी सदरहूप्रमाणें आपली लेकी तू आपणास पुत्राच ठाई आहेसी म्हणोनु तुज दिधले असे आपण जिते तोवरी ओरण आपण व तू सात आहे आपणास मेलियावरी सदरहू टके वीस २० समुदे तुवां खाणें तुज आपण दिधले आहेती सुखे तुवा भउनु आसणे व माहाद प्रभूचा कागद त्याचे दस्तुरेसी मजपासी होता तो आपण तुजपासी दिधला असे जैसे काही आपण सात आहे तैसेच आपणामागे तुवा खाण तुज आपण पुत्रत्वे मानून तुला सदरहूप्रमाणे दिधले आहे सुखे त्यापासून घेउनु सात जाणे आपण आपले खुसीन तुज दिधले असे हे लिहिले सही

( दोन घोगड्यांचा आकार ) निस्याण कारुण
हिराई

गोही

मामाजी पलाल हेजीब मामले मजकूर
कोनेरी विठल पोतदार का। मा मामले
गुलसनाबाद
धोडाजी महाजन
नीलकंठ अजहता सिवाजी कुलकर्णी
का। मा
विसाजी बुरकाले

बसव सेटी विन नागसेटी सेटिया कसबे
नासीक
बसव सेटीचे आहेने
नीलकंठ अजहती
सिवाजी कुलकर्णी का
मा याने लिहिले असे
मळ म्हेतर सेळी म्हेतरीया
गिरमाजीभट डिग ( रे )
बरवाजी प्रभु

---

ले २९१ श १५५४ चैत्र शु॥ ९
ता २०।३।१६३२ इ

( फारसी सरळ ४५ ओळी आडव्या २३ ओळा )

सके १५५४ अंगिरा संवछरे चैत्र सुध नवमा तदुनी अतभट + व भट व मटभट व रगभट चद्रात्रे विन बाबुभट चद्रात्रे का। नासीक येथीं आपण हरबाजी प्रभु व सोनप्रभु ( वाला ) प्रभु यासि लेहोन दिधले येसे जे आपणास सुकराइ येे(लो) लागली मग आपली मुलेदणाचे सडी मौजे विन्हवली व राजूर + काम वाड सडी १ यांसि आत्मसंतोसे दिधली असे याचि किमत अवधि मिलोन होनु १४ घतले तडियाचे दुमाले आसोत सुकाल जालिया उपरी यासा व आपणासि समध नाहा आर्पला आपण गोत्रज व कोण्ही इलेमदावार व हमशाई हरकाण्ही छो(व) केलें तरी आपण निवारणे सादेसीहुनु मदेसीहुनु जिवत याचून आले व आपली माऊ- जइ बनाइ इने होन १ कालातरे सौधा मला द्रमाहे रा॥ ॥ बनाइ बोलिली येसे जे येही कागद तुम्हास लेहोन दिधला याव(ग)ला तुम्हापासुनु तुमचा उपाध्याये याचा वीश रुणभट आहे भले ते उपाधेवीचे ते करणे यामुल ज्याला अध रा मा रोला तरी सेडी तुमचिच आहेत हे लिहिलें सही *बीकलम बो अतभट यान रगभट चद्राच्य हें लीहीलें सही

गोही

| | | |
|---|---|---|
| ईद्रभट क्षेमकल्याणि | कृष्णाजी आ(१) | नारा आपदेऊ |
| मोनभट पुराणिक | बापूजी पाटील | देसपांडिया गुल |
| विठोजी नरसिंह | मोकदम राजूर | सनाबाद |
| महिपती गोपिनाथ देसकुलकरणी | + सी सोनदेव | |
| बापूजी नारायेण | | निम्या ( बापूजी ) नयूजी इ |
| का। मजकूर | | सान पाटील जाधव |
| राघोजी गोविंद कुलकरणी | | मौजे राजूर बेल |
| मौजे राजूर बोसवले | | + उ पाटील मणु + |
| + आयाजी सु धु मे | | मोकदम मौजे सडक्सुर |
| जेस पाटील मोकदम | | जावजी देसकर निशान |
| मौजे विल्होली | | बापूजी रुद्र कुलकरणी मौजे |

१ सोडलें आहे * पेथून अक्षर बाळबोध व अगदीं ओबडधोबड

[1]म्हाळजी भग भांग ! पसे ! येसाजी पा + ? निशाण !

गोही

| | |
|---|---|
| मेहूजी देसमुख व | बापाजी देसमुख |
| कृस्णाजी देसमुक | हासोजी देसमुख |

त्रियक गेपेदळ देसपडिया गोही कसबे धर्माधकरणि लिहून दिधला यावर गोही लिहिली सही

हरबाजी खडदेळ देसपाडिये पा मजकूर

---

ले १९३

श १५५४ चैत्र शु १०
ता २१।३।१६३२ इ

( फारशी शिक्का व सात ओळी मजकूर )

सके १५५४ अंगिरा नाव सवछरे चइत्र सुध दसमी तदिसी हरबाजी व सोनभट व बालभट प्रभु धर्माधिकारनी कसबे नासीक यासी अनतभट व भगवा चद्रात्रे बिन रगभट व रगभट बिन बापुभट व बनाइ चद्रात्रे को मजकूर आत्मसुख लेहोन दिधले ऐसे जे दुकाल पडला आपणास खावयास नाही आपली मानसे दुकाला करिता बहुत मेली आपनहि बहुत दुटक(?) जालो खावयास काही नाही या बदल आपली खेडी मुलेरनाची देहे ३ मौजे वीर्‍होली व राजूर घोसले व कामतवाडे येसी मिरासी आहेत ते तुम्हास विकत दिधला याची किमती होन १५० पधरा घेतले खेडी तुम्हास मिरासी करुनु दिधली आसे तुम्ही सुख लकराचे लकरी खान व आपला गोत्रज व बद्भाऊ व हमरहा हर कोण्ही उभा राहील तो आपण निवारून तुम्हासी निसबती नाही सुकाल जाला आनी आपन वाचलो तन्ही गावासी व आपनासी समद नाही तुम्ही मुख मिरासी खान यासी आपन आनसारिस करु ने आपलिया सुरुताची आन असे

गोही

नारो आपदेउ विराजर कासी आपदेऊ देसपाडे मामले गुलसनाबाद
सीवाजी सोनदेवा ळत(?) कसबा नासीक
अनताजी बालपे कुलकर्नी मौजे भोतुरु

( पाठीमागे ) परवाना काजी अयक सेडयाचा महजर

---

१ मोडी द काढुन नतर बालबोधीप्रमाणे दीर्घ ऊकार काढिला आहे चुकून दकार वाचला गेल्यानतरची ही दुरुस्ती दिसते

ले १९४

श. १५६३ आश्विन शु. १५
ता ८।१०।१६४१ इ •

( फारसी दीड ओळ व द्वादशदली फारसी वर्तुळाचा शिक्का )

इ महजर बिहुजूर हजीर मजालसी ठाणे मामले गुलसनाबाद

मीर महमद रजा अर्मान

ज १ म व ३ र [
म ल व ३ × ]
व गा × ॥ ३ म × चिन
महता जटमल पा मार
देसमुख पा मा तरफ मोनाडी
+ उजी पा बयाजी पा



कृष्णाजी वडोजी
पा
नि. मागर नि मागर
चिा विसुमद पाराशेरे
हेजीब देसमूस
मामाजी मलाल सायाजी
+ + मलाल केशवराऊ
सिदो मलाल दा सु
तरफ घोगडा बायजी पाटील
सिवाजी अनंत कुलकर्णी का नासीक
सिवाजी सामराज यादी + +
आपदेक

मया बल्भद्रदास
सेसदार (फारसी वाटोळा शिक्का)
मया भूपतीराऊ कारकून
(फारसी शिक्का व नांव आडवें)
देसपाडे
त्रिंबक गोपीनाथ व हरबाजी सडेराऊ
कासी आपदेऊ व विसाजी त्रिमल

दा कासी आपदेक
दा त्रिंबक गोपदेक
देसपांडिया व हर बाजी सडदेऊ देस
पांडिये
कृष्णाजी पाटील
मोकदम का नासीक
वेंकाजी गोपीनाथ
वकील तरफ जवार

सेटे माहाजन
बसवसेटि नाऊसेटी
सेटिया माहाजन
बापूजी + जी तुजा +
नासीक

ले. २९५

श. १५६३ आश्वीन शु १५
ता. ८।१०।१६४१ इ. स.

+ ले मजकूर सुा इसन अवेन अल्फ सन १०५१ कारणे महजर येला येसा जे सोन प्रभु विन वोद्व प्रभु धर्माधिकरणी का मजकूर हाहुजा येउनु फिर्यादी जाला की गण शुक्ल आपले रास ब्राह्मणमधे पगतीस जेऊ देत नाही याये यल गालितो हे हजीर मजालसी मनास आणून आपणास खरेखोटे केले पाहिजे म्हणोनु बोलिला यावरून समस्त ब्राह्मणभट बोलाउनु पुसिले ते(व)ल्ही गण सुक्ल + बोलिला जे हा व याची आवरत कालामधे कोकणात गेले होते तेथे (शुद्र)चे हातिन —— याचे येथे अन खादले म्हणोनु आपण आईकिले यावरून आपण यास यालितो ये याचे स्नान करुनु शुध जाला पाहिजे म्हणोनु जेऊ देत नाही येसे बोलिला यावरी सोन प्रभु बोलिला जे आपण जवारतकेस कालामधे होतो तेथे आपण गावी नव्हतो अवरत येकली येथिरथ होती उठवेना मग सुद्राचे हाते चाहुल धुऊनु चुलीवरी ठेविले ते तिणे उतरून घेऊनु अरगात घदल हा दोश होता यापदल आपण जवारेस थोर थोर ब्राह्मण होते त्यासी जाऊनु सागितले तिही ग्रथ काढून आपणास प्रायेश्चीत सागितले ते केले आहे समस्त ब्राह्मण आहेती दिनकरभट, गोही आहेती हाली वाराणसीस आहे (!) + सोन प्रभु बोलिला यावरी हाजीर मजालसी बोलिलो जे पहिले प्रायेश्चीत भली ब्राह्मणी दिधले आसिलेवरी आता काये कारण बालावयास काही समधु नाही येसे वि + करिताती दिनकरभट मुख्य करून भले ब्राह्मणी जवारेस प्रायश्चीत दिधले होते यामधील दिनकरभट वाराणसीस होते ते अकस्मात नासिकास आले यावरी यास पुसावया पाठविले तिही सागितले जे सोनप्रभुचे अवरतेचे प्रायेश्चीत निश्चयेसी जाले आहे यासी बालावयास समधु नाही म्हणोनु समस्त ब्राह्मणदेखत सागितले व हाजीर मजालसी यासहि सागोन पाठविले यावरून सोन प्रभूचा शुधतेचा निवाडा जाला सोनप्रभूचे अव(र)तेचे प्रायेश्चीत जाले आहे येसा निवाड जाला व दिनकरभटी सदरहूप्रमाणे सागितले ते समस्त ब्राह्मण नासीक + + त्याही मानले यावरून सोनप्रभु व याची अवरत निर्दोश असे यास जो कोणी हाली कैफती व कथला करील तो दिवाणीचा गुन्हेगार व गोताचा अन्याई मोर्तबसुद* तेरीख १२ माहे रजबु सन हजार १०५१

ले. २९६

श १५६८ ज्येष्ठ व. ५
ता. २४।५।१६४६ इ

( फारसी सिका व दोन आडव्या ओळी मजकूर )

रुजु विसाजी
राम गुा आमीन

* अक्षर वेगळें १ ला वर्षी हिजरी व फसली सन एकच जमले आहेत.

